**महाराष्ट्र राज्यातील अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना शासन सेवेत थेट नियुक्ती देण्यासंदर्भात सुधारीत धोरण...**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खेआक्ष-१५२२/प्र.क्र.०६/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०९ जुलै, २०२४

वाचा -

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.राक्रीधो २००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक ३०/०४/२००५
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.खेआस-२०१०/(प्र.क्र.२७२/१०)/क्रीयुसे-२, दिनांक ०९/१२/२०१०
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.खेआस-२०११/(प्र.क्र.६/११)/क्रीयुसे-२, दिनांक २१/०५/२०११
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.खेआस-२०११/(प्र.क्र.६/११)/क्रीयुसे-२, दिनांक १०/०४/२०१३
५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.खेआक्ष-१५१५/प्र.क्र.७१/क्रीयुसे-२, दिनांक ०१/१०/२०१५
६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक खेआक्ष-१५१६/प्र.क्र.२२२ (भाग-१)/ क्रीयुसे-२, दिनांक १६/०५/२०१७ व दिनांक ०५/०६/२०१७

प्रस्तावना :-

राज्याचे नाव उज्ज्वल केलेल्या अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना शासकीय सेवेत थेट नियुक्ती देण्याबाबत संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक ३०/०४/२००५ शासन निर्णयात आदेश देण्यात आले आहेत. याबाबत सविस्तर आदेश व कार्यपध्दती संदर्भाधीन क्र.२ येथील दिनांक ९ डिसेंबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेली आहे. त्यानंतर सदर कार्यपध्दतीमध्ये संदर्भ क्र.३ व ४ येथील शासन निर्णयान्वये काही अतिरिक्त तरतूदींचा समावेश करण्यात आलेला आहे. उपरोक्त संदर्भ क्र.५ व ६ येथील शासन निर्णयान्वये या अनुषंगाने सुधारीत आदेश देण्यात आलेले आहेत.

२. सध्याच्या तरतुदीनुसार खेळाडूंना विविध विभागांत थेट नियुक्ती देण्यात आल्यानंतर प्रामुख्याने पुढील अडचणी येत असल्याचे निदर्शनास आले आहे -

- नियुक्तीनंतर खेळाडूंना खेळातील कारकीर्द सुरू ठेवणे शक्य होत नाही. काही वेळा खेळाचे प्रशिक्षण, सराव यासाठी दीर्घ कालावधी/संपूर्ण वेळ देता येत नाही. यामुळे त्यांच्या खेळावर व परिणामी खेळातील प्रगतीवर प्रतिकूल परिणाम होतो.
- खेळाडूंच्या थेट नियुक्तीनंतर ते प्रशिक्षण, सराव, स्पर्धेत सहभागी झाल्यामुळे शासकीय कामकाजावरही विपरीत परिणाम होतो.

- त्याचप्रमाणे खेळाडूंची ज्या पदावर नियुक्ती झाली आहे, त्या पदासाठी विहीत केलेली विभागीय परीक्षा उत्तीर्ण करणे, प्रशिक्षण/परिविक्षा कालावधी पूर्ण करणे या शासकीय बाबींची पूर्तता करणे खेळाडूंना शक्य होत नाही.
- खेळाडूंना शासकीय सेवेत अन्य विभागातील पदांवर नियुक्ती दिल्यानंतर त्यांनी क्रीडा विभागात क्रीडा विषयक कामकाज करण्याची इच्छुकता व्यक्त केली आहे.

त्याचप्रमाणे गुणवत्ताधारक खेळाडूंना प्रामुख्याने क्रीडा विभागात थेट नियुक्ती दिल्यास, क्रीडा विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांची परिणामकारक अंमलबजावणी करणे तसेच उदयोन्मुख खेळाडूंना दर्जेदार प्रशिक्षण देण्यासाठी त्यांच्या क्षमतांचा वापर करुन सक्षम खेळाडू निर्माण करणे या दोन्ही बाबींसाठी त्यांचा लाभ होईल.

३. उपरोक्त सर्व बाबी विचारात घेवून, शासन सेवेत थेट नियुक्तीसाठी पात्र ठरणाऱ्या खेळाडूंच्या क्रीडा अर्हतेमध्ये कालपरत्वे बदल करण्याची व नियुक्तीबाबत सुधारीत धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यास्तव **संदर्भाधीन सर्व शासन निर्णय अधिक्रमित करुन** अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना शासन सेवेत थेट नियुक्ती देण्याबाबतचे सुधारित धोरण, त्यासंदर्भातील कार्यपद्धती व निकष याबाबत खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

**शासन निर्णय -**

या शासन निर्णयाद्वारे अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना थेट नियुक्तीचे सुधारित धोरण व त्याबाबतची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

१) अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना थेट नियुक्ती देण्याबाबत शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्याखाली निर्माण करण्यात येणाऱ्या पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे -

| अ. क्र. | पदनाम | ७ व्या वेतन आयोगानुसार वेतन मॅट्रीक्स मधील वेतनस्तर (रु.) | पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | सहसंचालक, क्रीडा प्रशिक्षण (गट-अ) ( मुख्यालयात) | एस - २५ : ७८८००-२०९२०० | १ |
| २ | उपसंचालक, क्रीडा प्रशिक्षण/विशेष कार्य प्रशिक्षण अधिकारी (गट-अ) | एस - २३ : ६७७००-२०८७०० | १ |
| ३ | मुख्य क्रीडा कार्यकारी अधिकारी (प्रशिक्षण) (गट-अ) | एस - २० : ५६१००-१७७५०० | ७२ |
| ४ | क्रीडा कार्यकारी अधिकारी (प्रशिक्षण) (गट - ब राजपत्रित) | एस - १७ : ४७६००-१५११०० | ११७ |
| ५ | क्रीडा विकास अधिकारी (प्रशिक्षण) (गट -ब अराजपत्रित) | एस - १४ : ३८६००-१२२८०० | १८० |
| ६ | सहायक क्रीडा विकास अधिकारी (प्रशिक्षण) (गट -क) | एस - १० : २९२००-९२३०० | १८० |
| | | **एकूण** | **५५१** |

वरील सर्व पदे राज्यस्तरीय राहतील. सदर पदे क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या मुख्यालयाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येतील. तथापि, जे खेळाडू नियुक्तीनंतर पुढील स्पर्धांमध्ये सहभाग घेवू इच्छितात, अशा खेळाडूंना त्यांच्या खेळाच्या सोयी-सुविधा जेथे उपलब्ध असतील ते विचारात घेवून आणि प्रशासकीय निकड विचारात घेवून पदस्थापना देण्यात येईल. उर्वरीत खेळाडूंबाबत उदयोन्मुख खेळाडू घडविण्याच्या दृष्टीने त्यांच्या अनुभवाचा उपयोग होण्याकरिता यथास्थिती क्रीडा विभागाच्या मुख्यालयात/विभागीय कार्यालयात/जिल्ह्यात पदस्थापना देण्यात येईल.

२) **पदनिर्मिती -**

क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर क्रीडा प्रशिक्षण शाखेसाठी खालीलप्रमाणे एकूण ५५१ पदांचा आकृतीबंध प्रस्तावित करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | तपशील | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सद्यस्थितीत आकृतीबंधानुसार क्रीडा मार्गदर्शकांची मंजूर पदे | १२७ |
| २ | मानधन तत्वावर सद्यस्थितीत १५३ पदे मंजूर असून या पदांना नियमित वेतनश्रेणीतील पदांमध्ये रूपांतरीत करण्याचे प्रस्तावित आहे | १५३ |
| ३ | नव्याने मंजूर करण्यात येत असलेली पदे | २७१ |
| | **एकूण पदे** | **५५१** |

उपरोक्त तक्त्यातील अ.क्र.३ येथील २७१ पदे थेट नियुक्ती करण्यासाठी त्या त्या संवर्गात आगामी पाच वर्षात आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन द्यावयाची आहेत. क्रीडा मार्गदर्शक गट-ब (अराजपत्रित) या पदावर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांचे क्रीडा विकास अधिकारी (प्रशिक्षण) गट -ब (अराजपत्रित) या पदावर समायोजन करण्यात येईल. याकरिता सदर कर्मचाऱ्यांकडून समायोजनाबाबत इच्छुकता मागविण्यात येईल. जे कर्मचारी नवीन संवर्गात समायोजन करण्यास संमती दर्शवतील, त्यांना सध्या कार्यरत असलेल्या "क्रीडा मार्गदर्शक" संवर्गाच्या पदोन्नती साखळीमधील पदांवर पदोन्नती अनुज्ञेय असणार नाही. जे कर्मचारी सध्याच्या क्रीडा मार्गदर्शक संवर्गातच राहण्याचा पर्याय निवडतील, अशा कर्मचाऱ्यांच्या पदोन्नतीने/सेवानिवृत्तीने/अन्य कारणाने पदे जसजशी रिक्त होतील, तसतशी सदर पदे कायमस्वरूपी प्रस्तावित क्रीडा प्रशिक्षण शाखेत सदर संवर्गात वर्ग करण्यात येतील.

थेट नियुक्तीकरिता पात्र खेळाडूंची संख्या वाढल्यास आवश्यकतेनुसार अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत वित्त विभागाच्या मान्यतेने त्यावेळेस निर्णय घेण्यात येईल.

**३)** खेळाडूंच्या थेट नियुक्तीकरीता पदनिहाय पात्र स्पर्धा व खेळविषयक अर्हता सोबत जोडलेल्या **परिशिष्ट १ प्रमाणे** असेल.

**४) थेट नियुक्तीसाठी पात्र खेळ व अनुषंगिक बाबी -**

१) ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धेमध्ये समाविष्ट असलेले सर्व खेळ, थेट नियुक्तीसाठी पात्र राहतील. संबंधित ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धेमध्ये कोणते खेळ समाविष्ट करावयाचे अथवा

वगळायचे याबाबत आंतरराष्ट्रीय ऑलिम्पिक समिती साधारण ७-८ वर्षे आधी निर्णय घेते. त्यामुळे खेळाडूने कोणत्याही पात्र स्पर्धेत त्या खेळात विहित अर्हता प्राप्त केली असेल, त्याच्या अगोदर झालेली एक ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धा अथवा त्यानंतरची एक ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धा यापैकी कोणत्याही एका ऑलिम्पिक स्पर्धेमध्ये सदर खेळ समाविष्ट असणे आवश्यक राहील.

उदा :- सन २०२२ या वर्षात आयोजित पात्र क्रीडा स्पर्धेत विहित क्रीडा अर्हता प्राप्त केलेल्या खेळाडूंची थेट नियुक्ती करण्यासंदर्भात, सन २०२०/२०२४ यापैकी कोणत्याही ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धेत आयोजित झालेले/होत असलेले खेळ पात्र राहतील.

२) थेट नियुक्तीकरीता पात्र खेळांचे जागतिक स्तरावरील जागतिक चषक/जागतिक अजिंक्यपद (वरिष्ठ गट) स्पर्धेमध्ये आयोजित होणारे उपप्रकार पात्र राहतील.

३) अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडू ज्या क्रीडा स्पर्धेतील कामगिरीच्या आधारे थेट नियुक्तीकरिता अर्ज करेल, सदर क्रीडा स्पर्धेत तो सांघिक स्पर्धेमध्ये सहभागी झाला असेल, त्यामध्ये किमान ८ देशांचा/संघाचा सहभाग आवश्यक राहील आणि वैयक्तिक स्पर्धेमध्ये सहभागी झाला असेल, त्यामध्ये वैयक्तिक क्रीडा प्रकारात/संबंधित वजनी गटात किमान १२ खेळाडूंचा सहभाग आवश्यक राहील. सदर किमान सहभागाची अट ही ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धा आणि आशियाई क्रीडा स्पर्धेमधील पदक विजेते खेळाडू यांचे प्रकरणी आवश्यक असणार नाही.

४) दिव्यांग खेळाडूंसाठीच्या स्पर्धामध्ये अशा खेळाडूंचे सहभागाचे प्रमाण कमी असल्याने अशा खेळाडूंच्या स्पर्धामध्ये सहभागाचे प्रमाणही अत्यल्प असते. दिव्यांग खेळाडूंच्या स्पर्धामध्ये (पॅरालिम्पिक क्रीडा स्पर्धा/डेफ क्रीडा स्पर्धा) सर्वसाधारण खेळाडूंच्या स्पर्धाप्रमाणे सहभाग नोंदविला जात नाही. यास्तव, पॅरालिम्पिक क्रीडा स्पर्धा/डेफ क्रीडा स्पर्धा मध्ये सांघिक प्रकारात किमान ६ देशांचा/राज्यांचा सहभाग असणे आवश्यक आवश्यक राहील. तसेच वैयक्तिक स्पर्धेमध्ये (वैयक्तिक क्रीडा प्रकार/प्रत्येक वजनी गटात) स्वतंत्रपणे किमान ६ खेळाडूंचा सहभाग आवश्यक राहील. सदर किमान सहभागाची अट ही पॅरा ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धा आणि पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धेमधील पदक विजेते खेळाडू यांचे प्रकरणी आवश्यक असणार नाही.

५) अत्त्युच्च गुणवत्ताधारक खेळाडू क्रीडा स्पर्धेत उत्तेजक द्रव्य चाचणी (Doping) मध्ये दोषी ठरल्यास आणि सदर उत्तेजक चाचणीबाबत अंतिम आदेश देणाऱ्या संस्थेनेदेखील (उदा.जागतिक डोपिंग रोधी यंत्रणा WADA, राष्ट्रीय डोपिंग रोधी यंत्रणा NADA) सदर आदेश कायम केल्यास, अशा खेळाडूस देण्यात आलेली थेट नियुक्ती तात्काळ संपुष्टात आणण्यात येईल. तथापि, थेट नियुक्त खेळाडूने समुचित प्राधिकरणाकडे अपिल दाखल केले असल्यास त्याच्याविरुध्द उत्तेजक द्रव्य चाचणी (Doping) प्रकरणाबाबत चौकशी चालू असेल तोपर्यंत त्याला/तिला, खेळाचा सराव/प्रशिक्षणाकरिता खेळाडू म्हणून देण्यात येणारी सवलत अनुज्ञेय राहणार नाही.

५) **नियुक्तीसाठी आवश्यक अर्हता :-**

१) खेळाडू संबंधित पदाच्या सेवा प्रवेश नियमातील विहीत शैक्षणिक अर्हता किमान व कमाल वयोमर्यादा, विहीत केलेल्या अन्य तरतुदींची पूर्तता करीत असल्यासच त्या पदावर थेट नियुक्तीसाठी पात्र ठरेल. तसेच, सदर खेळाडूस थेट नियुक्तीनंतर वेळोवळी विहित सेवाविषयक व अन्य बाबींची पूर्तता करणे बंधनकारक राहील. सदर खेळाडूंना महाराष्ट्र नागरी सेवा नियम लागू राहतील.

२) या धोरणानुसार थेट नियुक्तीसाठी खेळाडूंनी परिशिष्ट -१ मध्ये नमूद केलेली पात्रता धारण केल्यापासून, ५ वर्षाच्या आत थेट नियुक्तीसंदर्भात आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे अर्ज करणे आवश्यक राहील.

३) थेट नियुक्ती दिलेल्या खेळाडूने नियुक्तीनंतर भविष्यात वरिष्ठ पदासाठी आवश्यक असलेली क्रीडा अर्हता प्राप्त केल्यास, त्यांना वरिष्ठ पदांवर थेट नियुक्तीसाठी अर्ज करण्याची मुभा असेल.

६) **खेळाडूने थेट नियुक्तीसाठी करावयाची कार्यवाही :-**

i. अर्ज करण्याचे ठिकाण - शासकीय सेवेत थेट नियुक्तीकरिता खेळाडूने आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी विहीत केलेल्या नमुन्यात त्यांच्या कार्यालयात अर्ज सादर करावा.

ii. अर्जात नमूद करावयाच्या बाबी- खेळाडूने सोबत जोडलेल्या परिशिष्ट- १ मधील तक्त्यात नमूद सर्व अर्हता विचारात घेऊन कोणत्या पदासाठी अर्ज करण्यात येत आहे, ही बाब नमूद करावी.

**७) आयुक्त, क्रिडा व युवक सेवा संचालनालयाने करावयाची कार्यवाही :-**

क्रीडा संचालनालयाने, खेळाडूंकडून प्राप्त होणाऱ्या अर्जांची छाननी करुन, अर्जात नमूद पदावर ते त्यांच्या खेळातील अत्युच्च गुणवत्ता व इतर अर्हतेनुसार नियुक्ती देण्यासाठी पात्र आहेत किंवा कसे याबाबतचा अहवाल कागदपत्रांसह शासनास सादर करावा.

८) **शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने करावयाची कार्यवाही :-**

क्रीडा संचालनालयाकडून प्राप्त झालेल्या अहवालानुसार संबंधित खेळाडू क्रीडा विभागातील सदर पदाच्या सेवाप्रवेश नियमानुसार आवश्यक असलेली शैक्षणिक अर्हता, वयोमर्यादा व इतर सर्व अटींची पूर्तता करतात किवा कसे याबाबत सविस्तर तपशील नमूद करुन समितीपुढे प्रस्ताव सादर करावा.

९) **खेळाडूंना थेट नियुक्तीसंदर्भात शासनास शिफारस करण्यासाठी समिती :-**

अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना शासन सेवेत थेट नियुक्ती देण्यासंदर्भात शासन स्तरावर सादर होणाऱ्या प्रस्तावांची गुणवत्तेवर छाननी करून, शिफारस करण्यासाठी अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र | पदनाम | समिती पदनाम |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सेवा) | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (क्रीडा) | सदस्य |
| ४ | आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ५ | सह/उपसचिव (क्रीडा) | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा व अधिकार -**

१. थेट नियुक्तीकरिता समितीसमोर विचारार्थ प्रस्तावांची छाननी करुन, खेळाडूंच्या थेट नियुक्तीसंदर्भात पात्र/अपात्र याबाबत शिफारस करणे.

२. थेट नियुक्ती दिलेल्या खेळाडूची क्रीडा अर्हता अथवा अन्य बाबीसंदर्भात प्राप्त तक्रारीबाबत गंभीर/गुतागुंतीचे प्रकरण असल्यास त्यासंदर्भात शिफारस करणे.

३. यापुर्वी शासन सेवेत अन्य प्रशासकीय विभागात थेट नियुक्ती दिलेल्या खेळाडूंनी क्रीडा विभागात नव्याने निर्माण करण्यात येणाऱ्या समकक्ष वेतनश्रेणीतील पदावर नियुक्ती देण्याबाबत विनंती केल्यास याबाबत छाननी करुन, खेळाडूचे संबंधित पदावर समायोजन करावे किंवा कसे याबाबत शिफारस करणे.

४. मंजूर पदांपेक्षा जास्त खेळाडू थेट नियुक्तीकरिता पात्र ठरत असल्यास अशा पात्र खेळाडू संख्येइतकी अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यासंदर्भात व पात्र खेळाडूंना अधिसंख्य पदावर नियुक्ती देण्यासंदर्भात शिफारस करणे.

५. प्रस्तावित धोरणानुसार थेट नियुक्तीकरिता खेळ प्रकार निश्चित करण्याबाबत किंवा क्रीडा स्पर्धाबाबत विर्निदीष्ट मुद्दा उपस्थित झाल्यास याबाबत तसेच क्रीडा प्रकारात होणाऱ्या बदलाच्या अनुषंगाने तांत्रिक वा अन्य मुद्दा उपस्थित झाल्यास यासंदर्भात क्रीडा व युवक सेवा संचालनालयाकडून सादर होणाऱ्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शिफारस करणे.

६. उपरोक्त समितीस खेळाडूंच्या थेट नियुक्तीसंदर्भात उपस्थित मुद्द्यांबाबत आवश्यक असेल तेव्हा महाराष्ट्र ऑलिम्पिक असोसिएशन यांचे सहकार्य घेता येतील.

**१०) समितीच्या शिफारशींवर शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने करावयाची कार्यवाही -**

i. उपरोक्त समितीने केलेल्या शिफारशी विचारात घेऊन पात्र ठरलेल्या खेळाडूच्या नियुक्तीचा प्रस्ताव मा.मंत्री (क्रीडा) यांचे मान्यतेसाठी सादर करावा.

ii. सदर प्रस्तावास मा.मंत्री (क्रीडा) यांनी मान्यता दिल्यानंतर शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने संबंधित खेळा़डूंचे नियुक्ती आदेश निर्गमित करून सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांत आवश्यक त्या कागदपत्रांसह हजर होण्याबाबत खेळाडूंना कळवून त्याची प्रत आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना चिन्हांकीत करावी.

**११) खेळाडूचे नियुक्ती आदेश दिल्यानंतर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी करावयाची कार्यवाही -**

i. खेळाडू ३० दिवसांच्या वहीत मुदतीत कागदपत्रांसह आयुक्त (क्रीडा) पुणे येथे हजर झाल्यानंतर सदर कार्यालयाकडून मूळ कागदपत्रे तपासण्यात येतील. तसेच, त्याच्याकडून प्रथम खालीलप्रणाणे विकल्प लेखी स्वरूपात घेण्यात यावा.

- त्यास क्रीडा स्पर्धांमध्ये सहभागी होण्यासाठी सराव/ प्रशिक्षणासाठी, कर्तव्यावर हजर न राहण्याची सवलत हवी आहे

**अथवा**

- कर्तव्यावर लगेच हजर होणार आहे.

ii. खेळाडूंची वैद्यकीय तपासणी व पोलीस तपासणी अहवाल, इ. कार्यवाही करण्यात येईल.

iii. सदर कार्यवाहीअंती सर्व बाबींची पूर्तता करणाऱ्या खेळाडूस त्याने दिलेल्या विकल्पानुसार, प्रचलित शासन कार्यपद्धतीनुसार कर्तव्यावर रूजू करून घेवून त्याच्या पदस्थापनेचे आदेश **किंवा** त्याला सराव/प्रशिक्षणासाठी सवलत देण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात येतील.

iv. खेळाडूने दिलेल्या विकल्पानुसार कर्तव्यावर ज्या दिनांकास रूजू होईल अथवा सराव/प्रशिक्षणाची सवलत उपभोगून त्यानंतर क्रीडा विभागात कर्तव्यावर रूजू होईल, त्या दिनांकास त्याची सेवा ज्येष्ठता निश्चित करण्यात येईल.

**१२) <u>खेळाडूंना थेट नियुक्तीनंतर धारण करावयाची अर्हता</u> -**

(अ) खेळाडूंना थेट नियुक्तीनंतर, संबंधित पदाच्या सेवाप्रवेश नियमानुसार, नेताजी सुभाषचंद्र राष्ट्रीय क्रीडा संस्था पतियाळा किंवा बेंगळूरु किंवा कोलकाता किंवा तत्सम मान्यताप्राप्त संस्थेची क्रीडा मार्गदर्शन क्षेत्रातील पदविका धारण करणे किंवा आंतरराष्ट्रीय खेळ महासंघाव्दारा घेतले जाणारे लेव्हल कोर्सेस पूर्ण करणे किंवा इतर मान्यता प्राप्त संस्थेची त्या खेळाची प्रशिक्षण पदविका धारण करणे आवश्यक राहील. थेट नियुक्तीने नियुक्त होणारा खेळाडू अशी अर्हता धारण करीत नसेल अशा परिस्थितीत थेट नियुक्तीने नियुक्त होणाऱ्या अत्त्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना त्यांच्या नियमित नियुक्तीपासून (खेळाचा सराव/प्रशिक्षण यासाठी सवलत घेतली असल्यास तो कालावधी वगळून) पुढील ५ वर्षांच्या कालावधीत, सदर पदविका अभ्यासक्रम यशस्वीपणे पूर्ण करणे आवश्यक राहील. सदर अभ्यासक्रम पूर्ण करण्याकरिता खेळाडूंना सदर अभ्यासक्रम कालावधीसाठी विशेष रजा मंजूर करण्यात येईल. अशी रजा सेवा कालावधीत एकदाच अनुज्ञेय राहील.

थेट नियुक्ती दिलेल्या अत्त्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंनी उक्तप्रमाणे नियमित नियुक्तीपासून ५ वर्षाच्या कालावधीत वरील अर्हता धारण करणे आवश्यक आहे अन्यथा सदर अर्हता धारण करेपर्यंतच्या कालावधीपर्यंत प्रचलित शासन नियमानुसार कार्यवाही करण्यात येईल.

**१३) खेळाडूंना विकल्पानुसार खेळाचा सराव/प्रशिक्षण यासाठीच्या सवलतीची कार्यपद्धती -**

१) खेळाडूची क्रीडा विभागातील पदावर नियुक्ती झाल्यापासून ५ वर्षांचा कालावधी पूर्ण होईल किंवा त्याच्या वयाची ३० वर्ष पूर्ण होतील, यापैकी जे अगोदर होईल तोपर्यंत खेळाडूस कर्तव्यावर हजर राहण्याचे बंधन न घालता, पूर्ण वेळ संबंधित खेळाचा सराव करणे, त्या खेळाचे प्रशिक्षण घेणे यासाठीची सवलत देण्यात येईल.

२) सदर सवलतीचा लाभ घेणाऱ्या खेळाडूची ज्या क्रीडा अर्हतेच्या (पदक/स्पर्धा) आधारे शासन सेवेत थेट नियुक्ती झाली आहे, त्या स्तरावरील अथवा त्यापेक्षा वरच्या दर्जाच्या स्पर्धेत सहभागी होण्याची पात्रता सदर कालावधीत धारण करणे आवश्यक राहील. सदर कालावधीमध्ये खेळाडूंच्या कामगिरीचे प्रतिवर्षी मुल्यांकन खालील समितीमार्फत करण्यात येईल-

| अ.क्र. | पदनाम | समिती पदनाम |
|---|---|---|
| १ | सह संचालक, क्रीडा व युवक सेवा | अध्यक्ष |
| २ | संबंधित खेळाचे राष्ट्रीय पातळीवरील क्रीडा मार्गदर्शक* | सदस्य |
| ३ | महाराष्ट्रातील अर्जुन/ध्यानचंद क्रीडा पुरस्कारार्थी खेळाडू* | सदस्य |
| ४ | महाराष्ट्र ऑलिम्पिक असोसिएशनचा एक प्रतिनिधी# | सदस्य |
| ५ | संबंधित राज्य खेळ संघटनेचा एक प्रतिनिधी# | सदस्य |
| ६ | उप संचालक, क्रीडा व युवक सेवा (मुख्यालय) | सदस्य सचिव |

* आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांनी नामनिर्देशन केल्यानुसार

# संबंधित असोसिएशन/संघटनेने नामनिर्देशित केल्यानुसार

३) या कालावधीत समितीच्या मूल्यांकनानुसार खेळाडूची कामगिरी समाधानकारक/ आवश्यक निकषाइतकी न झाल्यास त्यांना खेळाडू म्हणून मिळणाऱ्या सवलतीचा लाभ देण्याचे बंद करण्यात येईल व त्यांना नियमित पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या पार पाडणे बंधनकारक राहील.

४) खेळाडूने सराव/प्रशिक्षणाकरिता सवलत घेतल्यास, सदर सवलत कालावधी संपल्यानंतर, खेळाडू त्यास थेट नियुक्ती देण्यात आलेल्या पदावर रूजू होईल, त्या दिनांकास त्याची त्या पदावरील सेवाज्येष्ठता निश्चित करण्यात येईल.

**१४)** जे खेळाडू व्यावसायिक स्तरावरील आयोजित झालेल्या स्पर्धांमध्ये खेळलेले आहेत किंवा खेळत आहेत, ते या धोरणांतर्गत थेट नियुक्तीसाठी पात्र ठरणार नाहीत. (उदा. आयपीएल, प्रो-कबड्डी, अल्टीमेट खो-खो, इ. स्पर्धा) तसेच, थेट नियुक्त झालेल्या खेळाडूंना अशा स्वरूपाच्या व्यावसायिक स्तरावर आयोजित होणाऱ्या स्पर्धांमध्ये सहभाग घेता येणार नाही. अशा स्पर्धांमध्ये त्यांनी सहभाग घेतल्यास त्यांना देण्यात आलेली थेट नियुक्ती तात्काळ रद्द करण्यात येईल.

१५) **थेट नियुक्त खेळाडूच्या विनंतीनुसार अन्य प्रशासकीय विभागात समायोजनाबाबत-**

प्रस्तावित धोरणानुसार, थेट नियुक्ती दिलेल्या खेळाडूने, शासनाच्या अन्य विभागांतील समकक्ष वेतनश्रेणीतील पदावर समायोजनाबाबत इच्छुकता दिल्यास त्याने खालील बाबींची पूर्तता करणे आवश्यक राहील:-

अ) खेळाडूने क्रीडा विभागात नियुक्तीनंतर (सवलतीचा कालावधी वगळून) किमान ०५ वर्षे सेवा पूर्ण करणे व स्थायित्व प्रमाणपत्र धारण केली असणे आवश्यक राहील.

ब) खेळाडूने नियुक्तीबाबत इच्छुकता दिलेल्या संबंधित पदाच्या सेवा प्रवेश नियमातील अर्हता धारण केली असणे आवश्यक राहील.

क) संबंधित प्रशासकीय विभागाने खेळाडूस इच्छुकता व्यक्त केलेल्या पदाच्या सरळसेवा कोट्यातील रिक्त पदावर रुजू करुन घेण्यास सहमती देणे आवश्यक राहील.

ड) खेळाडूंच्या इच्छुकतेनुसार अन्य विभागातील पदावर समायोजनाबाबत जास्त संख्येने प्रस्ताव असल्यास, खेळाडूंनी स्पर्धांमध्ये केलेल्या कामगिरीच्या आधारे त्यांचे गुणांकन करण्यात येईल व या गुणांकनाच्या आधारे उच्चतम कामगिरी करणाऱ्या व ज्येष्ठतम खेळाडूंचा विचार करण्यात येईल.

इ) खेळाडूस अन्य विभागातील पदावर समायोजनाबाबतचा प्रस्ताव थेट नियुक्तीकरिता गठीत केलेल्या समितीसमोर शिफारशीकरिता ठेवण्यात येईल. समितीच्या शिफारशीनुसार मा.मंत्री (क्रीडा) यांच्या मान्यतेनंतर उचित आदेश निर्गमित करण्यात येतील.

फ) सदर खेळाडू ज्या दिनांकास समायोजनाच्या पदावर रूजू होईल, त्या दिनांकास त्याची त्या पदावर सेवा ज्येष्ठता निश्चित करण्यात येईल. मात्र ही सेवाज्येष्ठता संबंधित पदास लागू असलेल्या सेवा प्रवेश नियमांतील तरतुदींच्या अधिन राहून निश्चित होईल.

ग) खेळाडूने इच्छुकता दिलेल्या पदावर त्याचे समायोजन केल्यानंतर, त्या पदासाठी विहीत केलेली विभागीय परीक्षा, प्रशिक्षण व इतर बाबींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

ह) थेट नियुक्त खेळाडूचे संपूर्ण सेवा कालावधीमध्ये एकदाच समायोजन करता येईल.

१६) यापूर्वीच्या धोरणानुसार अन्य विभागातील पदावर थेट नियुक्ती दिलेल्या खेळाडूंनी, क्रीडा विभागात समायोजनाबाबत इच्छुकता दर्शविल्यास, याबाबतचे प्रस्तावदेखील थेट नियुक्तीकरिता गठीत केलेल्या अ.क्र.९ येथील समितीसमोर शिफारशीकरिता ठेवण्यात येतील. तथापि, अशा खेळाडूंची सेवाज्येष्ठता ते क्रीडा विभागात रूजू होतील, त्या दिनांकास निश्चित करण्यात येईल.

१७) **खेळाडूंच्या थेट नियुक्तीसाठीची पदे लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेर असणे व या पदांना आरक्षण लागू नसणे -**

सदर पदे केवळ खेळाडूंच्या थेट नियुक्तीसाठी निर्माण करावयाची असून अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंची नियुक्ती त्यांच्या क्रीडा स्पर्धांमधील कामगिरीच्या आधारे होणार आहे. त्यामुळे प्रस्तावित पदांपैकी गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या

कक्षेतून वगळण्यासंदर्भात विहीत पद्धतीने स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल. तसेच, सदर पदांवर नियुक्ती ही खेळाडूंच्या कामगिरीच्या आधारे देण्यात येणार असल्याने सदर पदे भरताना एखाद्या प्रवर्गातील पद रिक्त असल्यास सदर पदे अन्य कोणत्याही प्रवर्गातील उपलब्ध खेळाडूंमधील पात्र खेळाडूद्वारे भरण्यास मुभा राहील.

**१८) सुधारीत धोरण लागू करण्याबाबत:-**

१) सुधारीत धोरण हे या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू होईल.

२) सद्यस्थितीत, अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंकडून थेट नियुक्ती देण्याबाबत प्रलंबित अर्जाच्या अनुषंगाने क्रीडा अर्हता यापूर्वीच्या थेट नियुक्तीच्या धोरणानुसार तपासण्यात येईल. मात्र त्यांची नियुक्ती या शासन निर्णयातील धोरणानुसार क्रीडा विभागात नव्याने निर्माण करण्यात येणाऱ्या पदांवर करण्यात येईल व त्यांना या धोरणातील अन्य तरतूदी लागू राहतील.

३) सध्या प्रलंबित अर्जातील खेळाडूंची कमाल वयोमर्यादा, त्यांनी अर्ज केल्याच्या दिनांकानुसार विचारात घेण्यात येईल.

४) प्रस्तावित धोरणातील गट-अ ची पदे व गट-ब (राजपत्रित) ची पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतून वगळण्यासंदर्भात विहीत पद्धतीने स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

६) सदर नव्याने निर्माण करावयाच्या पदांचे सेवाप्रवेश नियम तयार करुन त्यास सामान्य प्रशासन विभाग व विधी व न्याय विभागाची सहमती घेवून अंतिम करण्यात येतील. तसेच खेळाडूंच्या कर्तव्य व जबाबदाऱ्या आणि अन्य बाबी स्वतंत्रपणे ठरविण्यात येतील.

७) सध्याच्या धोरणानुसार, गट -ड पदावर नियुक्तीसाठीची क्रीडा अर्हता धारण करणाऱ्या व अर्ज प्रलंबित असलेल्या खेळाडूंना गट- ड पदावर नियुक्तीसंदर्भात तपासणी करुन समितीसमोर प्रस्ताव ठेवून समितीच्या शिफारशीनुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

८) सदरच्या धोरणाप्रमाणे निमशासकीय कार्यालय/शासकीय उपक्रमातील सांविधानिक संस्था/ जिल्हापरिषदा/ पंचायत समित्या/ ग्रामपंचायती/ नगरपरिषदा/ नगरपालिका/ महानगरपालिका/ मंडळे/महामंडळे /शासनाचे अंगीकृत व्यवसाय /विद्यापीठे /कृषी विद्यापीठे / शासकीय शिक्षण संस्था आश्रमशाळांसह/ सहकारी संस्था/ सहकारी साखर कारखाने/ सहकारी सूतगिरण्या/ बॅका/ सहकारी बॅका/ सहाय्यक अनुदान मिळणाऱ्या शासन मान्य स्वेच्छा संस्था यांच्यासह अन्य ज्या ज्या प्रकारच्या संस्था व कार्यालये ज्यांना राज्याच्या तिजोरीतून निधी/ अनुदान/ सहाय्यक अनुदान मिळते अशा सर्व प्रकारच्या संस्था/मंडळे यांनी त्यांच्या आस्थापनेवर गुणवत्ताधारक खेळाडूंच्या थेट नियुक्तीबाबत कार्यवाही करण्याची मुभा राहील.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग अनौ.सं.क्र.१५५/का.१२ (सेवा-२), दि.२६/०६/२०२४ आणि वित्त विभाग अनौ.सं.क्र.अनौसं-३९६/आपुक, दि.२६/०६/२०२४ आणि अनौसं-७१०/व्यय-५, दि.२७/०६/२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने तसेच मंत्रिमंडळाच्या दिनांक २८/०६/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०९१२००३०४२२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR
ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2024.07.09 19:45:10 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
५. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव,
६. मा.विधानसभा अध्यक्ष/उपाध्यक्ष यांचे खाजगी सचिव,
७. मा.विधान परिषद सभापती/उप सभापती यांचे खाजगी सचिव,
८. सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य,
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
१०. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. अपर मुख्य सचिव (क्रीडा), मंत्रालय, मुंबई,
१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१३. वित्त विभाग (व्यय-५/आपुक), मंत्रालय, मुंबई,
१४. सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१२), मंत्रालय, मुंबई,
१५. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
१८. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
१९. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
२०. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
२१. निवड नस्ती (क्रीयुसे-२)

शासन निर्णय क्रमांकः खेआक्ष १५२२/प्र.क्र.०६/क्रीयुसे-२ दिनांक ०९ जुलै, २०२४ सोबतचे **परिशिष्ट - १**

### १. मुख्य क्रीडा कार्यकारी अधिकारी (प्रशिक्षण) ( गट - अ )

| | पात्र स्पर्धा | खेळ विषयक अर्हता |
|---|---|---|
| १ | ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धा<br>पॅरालिम्पिक स्पर्धा | सुवर्ण, रौप्य किंवा कांस्य पदक प्राप्त केलेले खेळाडू |
| २ | आशियाई क्रीडा स्पर्धा<br>पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा | सुवर्णपदक प्राप्त केलेले खेळाडू |
| ३ | जागतिक क्रीडा स्पर्धा (वरिष्ठ गट)<br>वर्ल्ड पॅरालिम्पिक गेम्स स्पर्धा (वरिष्ठ गट) | |
| ४ | कॉमनवेल्थ क्रीडा स्पर्धा (खुला गट)<br>कॉमनवेल्थ पॅरा गेम्स (खुला गट) | |

### २. क्रीडा कार्यकारी अधिकारी (प्रशिक्षण) गट - ब (राजपत्रित)

| | पात्र स्पर्धा | खेळविषयक अर्हता |
|---|---|---|
| १ | मुख्य क्रीडा कार्यकारी अधिकारी (प्रशिक्षण) पदासाठीच्या क्रीडा अर्हतेनुसार पात्र खेळाडू | |
| २ | आशियाई क्रीडा स्पर्धा<br>पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा | रौप्य किंवा कांस्य पदक प्राप्त केलेले खेळाडू |
| ३ | जागतिक क्रीडा स्पर्धा (वरिष्ठ गट)<br>वर्ल्ड पॅरालिम्पिक गेम्स स्पर्धा (वरिष्ठ गट) | |
| ४ | कॉमनवेल्थ क्रीडा स्पर्धा (खुला गट)<br>कॉमनवेल्थ पॅरा गेम्स (खुला गट) | |
| ५ | अर्जुन पुरस्कारार्थी खेळाडू | |

### ३. क्रीडा विकास अधिकारी (प्रशिक्षण) गट - ब (अराजपत्रित)

| | पात्र स्पर्धा | खेळविषयक अर्हता |
|---|---|---|
| १ | मुख्य क्रीडा कार्यकारी अधिकारी (प्रशिक्षण) पदासाठीच्या क्रीडा अर्हतेनुसार पात्र खेळाडू | |
| २ | आशियाई चॅम्पियनशिप स्पर्धा (वरिष्ठ गट)<br>आशियाई पॅरा चॅम्पियनशिप स्पर्धा (वरिष्ठ गट) | सुवर्णपदक प्राप्त केलेले खेळाडू |
| ३ | ज्युनियर वर्ल्ड चॅम्पियनशिप स्पर्धा<br>ज्युनियर वर्ल्ड पॅरा चॅम्पियनशिप स्पर्धा | |
| ४ | कॉमनवेल्थ चॅम्पियनशिप (वरिष्ठ गट)<br>पॅरा कॉमनवेल्थ चॅम्पियनशिप (वरिष्ठ गट) | |

## ४. सहायक क्रीडा विकास अधिकारी (प्रशिक्षण) गट - क

| | पात्र स्पर्धा | खेळविषयक अर्हता |
|---|---|---|
| १ | क्रीडा कार्यकारी अधिकारी (प्रशिक्षण) पदासाठीच्या क्रीडा अर्हतेनुसार पात्र खेळाडू | |
| २ | आशियाई चॅम्पियनशिप स्पर्धा (वरिष्ठ गट)<br>आशियाई पॅरा चॅम्पियनशिप स्पर्धा (वरिष्ठ गट) | रौप्य किंवा कांस्य पदक प्राप्त केलेले खेळाडू |
| ३ | ज्युनियर वर्ल्ड चॅम्पियनशिप स्पर्धा<br>ज्युनियर वर्ल्ड पॅरा चॅम्पियनशिप स्पर्धा | |
| ४ | कॉमनवेल्थ चॅम्पियनशिप (वरिष्ठ गट)<br>पॅरा कॉमनवेल्थ चॅम्पियनशिप (वरिष्ठ गट) | |